महिला स्वातंत्र्य सैनिकाचे पती निधन झाल्यास
शासनाकडून आर्थिक मदत देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**परिपत्रक** क्र.सकीर्ण १००२/७१६/प्र.क्र.१०२/स्वा.सै.क.१

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक- ३० ऑगस्ट २००२

वाचा- १. शासन निर्णय क्र.पीओसी १०८२/विक-१/स्वासैक. दि.२४/१२/१९८२
२.शासन निर्णय क्र.पीओसी १०८२/५७७/विक-१/स्वासैक.दि.३.८.८३
३.शासन निर्णय क्र.पीओसी १२९२/प्र.क.१०२/९२/स्वासैक.दि.२२/१०/९३

**परिपत्रक**

महिला स्वातंत्र्य सैनिकाच्या पतीचे निधन झाल्यास रु.१०००/- आर्थिक मदत देण्याबाबत स्पष्टीकरण.

| उपस्थित केलेला मुद्दा | देण्यात आलेले मार्गदर्शन |
|---|---|
| १ | २ |
| शासन निर्णय क्र. पीओएस १०८३/ ५७७/ विक-१/वासै/दि.३.८.८३ अन्वये जिल्हाधिकारी यांना स्वातंत्र्य सैनिकाच्या विधवा पत्नीस निवृत्ती वेतन मंजूर करावयाचे व इतर आर्थिक सहाय्य (स्वा.सै.मयत झाल्यास) शासन निर्णय दि. २२.१०.९३अन्वये व शासन पत्र दि.१६.३.१९८४ अन्वये स्वातंत्र्य सैनिकाचा मृत्यु झाल्यास त्याच्या कुटूंबियांना आर्थिक मदत देण्याचे आदेश आहेत. तसेच पेन्शन धारक स्वातंत्र्य सैनिकाची पत्नी,आई किंवा वडील यांचा मृत्यु झाल्यास आर्थिक सहाय्य एक हजार मात्र देण्याचे आदेश आहेत. परंतु महिला स्वातंत्र्य सैनिकास तिचे पती वारल्यास आर्थिक सहाय्य मंजूर करण्याचे आदेश प्राप्त नसल्याने सदर महिला स्वातंत्र्य सैनिकाचे पती वारल्यास आर्थिक मदत मंजूर करण्यात यावी किंवा कसे! | शासन निर्णय क्र.१०८२/विक-१/ स्वासै, दि.२४.१२.८२ च्या शासन निर्णयानुसार एखाद्या स्वातंत्र्य सैनिकाचा मृत्यु झाल्यास त्याच्या कुटूंबियांना रु.२०००/- आणि त्याची पत्नी/आई किंवा वडील यांचा मृत्यु झाल्यास रु.१०००/- आर्थिक मदत दि. १.८.१९८२ पासून जाहीर केलेली आहे. ही मदत महिला सैनिकाच्या पती निधनानंतर पतीच्या संदर्भातही लागू राहील. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( वि.रा.घडेकर )
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव

kadam14

मुख्यमंत्री यांचे सचिव
उप मुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री/राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव
अध्यक्ष व इतर सदस्य, स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती
महालेखपाल महाराष्ट्र राज्य-१, मुंबई
महालेखापाल महाराष्ट्र राज्य-२,नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व जिल्हाधिकारी,
वित्त विभाग,(जीईएन-५ प्रतीसह )
वित्त विभाग,(इएक्सपी र ४)
अधिदाम व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिाकारी,मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
संचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालयत्र ( प्रसिध्दीपत्रक काढण्यासाठी )
प्रतीलिपी-
जिल्हाधिकारी ठाणे यांना त्यांचे पत्र क्र.सामान्य/का.४/टे११/स्वासै/कावि/१५२६७
दिनांक ६/६/२००२ च्या संदर्भात.